**श्री.हरिदास त्र्यबंक जाधव (रोजंदारी कर्मचारी) यांची रोजंदारीवरील सेवा शासन सेवेत नियमित करणेबाबत**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना ०२१८ /प्र.क्र.९२/पापु १५

७वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॅाफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४००००१
तारीख: ३० ऑगस्ट,२०१८

वाचा

1) **मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथील तक्रार युएलपी क्र. १६/२०११ प्रकरणी पारीत केलेले आदेश दि.१८.०६.२०१५**
2) **मा.उच्च न्यायालय मुंबई,खंडपीठ नागपूर येथील रिट याचिका क्र. ५५६७/२०१७ प्रकरणी पारीत केलेले आदेश दि.०२.०३.२०१७**

**प्रस्तावन**

श्री.हरिदास त्र्यंबक जाधव हे रोजंदारी तत्वावर मदतनीस या पदी वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा कार्यालय, बुलढाणा याठिकाणी कार्यरत होते . त्यांनी सन १९८५ पासूनची रोजंदारीवरील सेवा नियमित करण्यासाठी मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथे तक्रार युएलपी.क्र.१६/२०११ दाखल केलेली होती. याप्रकरणी मा.औद्योगिक न्यायालयाने दि.१८.०६.२०१५ च्या आदेशान्वये श्री.जाधव यांची सेवा आदेशाच्या तारखेपासून वर्ग-४ पदावर नियमित करुन नियमित कर्मचा-यांचे सर्व लाभ त्यांना अदा करण्याचे निर्देश दिले. सदर आदेशाविरोधात शासनामार्फत मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.५५६७/२०१७ दाखल करण्यात आली होती. तथापि सदर रिट याचिका दि.०२.०३.२०१७ च्या अंतिम आदेशान्वये खारीज करण्यात आल्याने, मा.औद्योगिक न्यायालय, अकोला यांनी पारीत केलेल्या दि.१८.०६.२०१५ च्या आदेशानुसार श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांच्या रोजंदारीवरील सेवा शासन सेवेत वर्ग-४ पदावर नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांनी मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथे दाखल केलेल्या तक्रार युएलपी.क्र.१६/२०११ प्रकरणी पारीत करण्यात आलेल्या दि.१८.०६.२०१५ रोजीच्या आदेशानुसार त्यांची रोजंदारीवरील सेवा या विभागाच्या अधिपत्याखालील भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेत खालील विवरणपत्रातील स्तंभ.क्र.३ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून वर्ग-४ संवर्गातील “पहारेकरी” या खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर त्याखालील अटी व शर्तीच्या आधीन राहून शासन सेवेत नियमित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | रोजंदारी कर्मचा-याचे नाव | नियुक्ती दिनांक | नियुक्ती प्रवर्ग | संवर्ग | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.हरिदास त्र्यंबक जाधव | १८.०६.२०१५ | खुला | पहारेकरी | रु.४४४०-७४४० ग्रेड वेतन रु.१३००/- |

अटी/शर्ती:-

१. पहारेकरी या पदाचे नियुक्ती प्राधिकारी प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे असल्याने श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांच्या पदस्थापनेचे आदेश प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती विभाग,अमरावती यांचे स्तरावरुन निर्गमित करण्यात येतील.

२. श्री.हरिदास त्र्यंबक जाधव पहारेकरी पदावर रुजु झाल्यानंतर त्यांची वरील विवरणपत्रातील स्तंभ.क्र.६ मध्ये नमुद वेतनश्रेणीमध्ये त्यांच्या नियुक्ती दिनांकास वेतन निश्चिती करण्यात यावी. वेतननिश्चिती नंतर देय मूळ वेतन त्यावर अधिक महागाई भत्ता व इतर देय भत्ते मिळुन त्यांना मासिक वेतन देय राहील.

३. श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम तसेच राज्य शासकीय कर्मचा-यांना लागु होणारे प्रचलित व वेळोवेळी निर्गमित करण्यात येणारे शासन निर्णय लागू राहतील.

४. श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांना वित्त विभाग अनिया-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ मधील तरतुदीनुसार नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागु राहील

५. श्री.हरिदास त्र्यंबक जाधव हे प्रथम नेमणुकीच्या पदग्रहणासाठी कराव्या लागणा-या प्रवासासाठी प्रवासभत्ता मिळविण्यास पात्र नाहीत.

६. श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांना मा.न्यायालयाच्या आदेशानुसार दि.१८.०६.२०१५ पासून नियमित करण्यात येत असल्याने त्या दिनांकापासून त्यांच्या रुजु दिनांकापर्यंत त्यांना देय होणा-या थकबाकीची परिगणना करुन सदरची थकबाकी त्यांना अदा करण्यात यावी. श्री.जाधव यांना थकबाकी अदा केल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी कार्यपूर्तता अहवाल शासनास सादर करावा.

श्री.हरिदास त्र्यंबक जाधव यांच्या वेतनावरील व त्यांना देय थकबाकी अदा करण्याकरीता होणारा खर्च हा भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कर्मचा-यांची वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावेत.

सदर शासन निर्णय हा सामान्य प्रशासन विभागाचे अनौपचारीक संदर्भ.क्र.७२४/का १२, दि.१८.०६.२०१८ व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ.क्र.१९०/व्यय-३, दि.१२.०७.२०१८ च्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१६१९५३३३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, serialNumber=14841ecd32c757d5bdc1bc806fcf798e88e12bf053f8b2c43a5b1825ab9eb880, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2018.08.30 13:01:27 +05'30'

**(महेश सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन शिवाजी नगर,पुणे
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२, महाराष्ट्र , मुंबई व नागपूर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती विभाग, अमरावती.
५. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा.
७. निवडनस्ती, पापु-१५